**निरीक्षक, वैध मापन शास्त्र, उदगीर विभाग या कार्यालयाच्या कार्यकारी मानक प्रयोगशाळेच्या उर्वरित कामकाजाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देणेबाबत..**

<u>महाराष्ट्र शासन</u>

**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक : वैमाशा-२०२३ / ४८/ प्र.क्र.२६/ग्रा.सं.-३**

दुसरा माळा, मंत्रालय (विस्तार),
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- २४ फेब्रुवारी, २०२५

**संदर्भ -** १) नियंत्रक, वैध मापन शास्त्र,मुंबई यांचे पत्र क्र. काजा (२८) / १६२४/प्र.क्र.२४६ /वैमाशा-२/९१, दि.२५.०१.२०२४.

२) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग क्र. २, यांचे पत्र क्र. ३५१४ , दि. ०१/१२/२०२२

३) वित्त विभाग, शासन निर्णय, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि. १७/०४/२०१५.

**प्रस्तावना:-** नियंत्रक, वैध मापन शास्त्र यांनी संदर्भ क्र.१ येथील पत्रान्वये निरीक्षक, वैध मापन शास्त्र, उदगीर विभाग या कार्यालयाच्या कार्यकारी मानक प्रयोगशाळेच्या इमारतीचे उर्वरीत कामासाठी रु. १९.५१ लाख इतक्या रक्कमेचे अंदाजपत्रक प्रशासकीय मंजुरी व निधी उपलब्ध करुन देण्याकरीता शासनास सादर केले आहे. त्यानुसार सदर अंदाजपत्रास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याचीबाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-** निरीक्षक, वैध मापन शास्त्र, उदगीर विभाग या कार्यालयाच्या कार्यकारी मानक प्रयोगशाळा इमारतीच्या उर्वरीत बांधकाम शिल्लक राहिले आहे. प्रयोगशाळेच्या इमारतीच्या समोरच्या बाजुची कंपाऊंड वॉल, मुख्य दरवाजाच्या वरचे वेदर शेड, पॅरापिट वॉल व फर्निचर इत्यादी करीता कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग क्र.२ , लातूर यांनी इमारतीच्या उर्वरित कामासाठी रु. १९.५१ लाख फक्त इतके सविस्तर अंदाजपत्रक सन २०२२-२०२३ च्या सार्वजनिक बांधकाम विभागाच्या दरसूचीवर आधारित आहे. तसेच सदर अंदाजपत्रकास मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नांदेड / कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग क्र.२, लातूर यांची तांत्रिक सहमती घेण्यात आलेली आहे. त्यानुसार निरीक्षक, वैध मापन शास्त्र, उदगीर विभाग या कार्यालयाच्या कार्यकारी मानक प्रयोगशाळेच्या इमारतीच्या उर्वरित कामासाठी रु. १९,५१,०००/- (अक्षरी एकोणीस लाख एकावन्न हजार फक्त) इतक्या खर्चाचे अंदाजपत्रकास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

०२. उपरोक्त प्रयोजनार्थ या आदेशान्वये सन २०२४ -२०२५ या आर्थिक वर्षामध्ये रू.१९.५१ लाख इतका निधी वितरीत करण्यात येत आहे. सदर प्रयोजनार्थ नियंत्रक, वैध मापन शास्त्र यांना नियंत्रक

अधिकारी घोषित करण्यात येत असून नियंत्रक, वैध मापन शास्त्र यांनी सदर निधी संबंधित कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग यांचेकडे हस्तांतरीत करावा.

०३. उपरोक्त खर्च मागणी क्रमांक, एम-५ मुख्य लेखाशिर्ष ५४७५ इतर सर्वसाधारण आर्थिक सेवांवरील भांडवली खर्च ८०० इतर खर्च (००) (०१) वजने व मापे यांच्या पायाभूत सुविधांचे बळकटीकरण (योजनांतर्गत) (५४७५ ०२४८) ५३ मोठी बांधकामे या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

०४. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/ प्र.क्र.३०/१३/ विनियम (भाग-२), दि.२०.०९.२०१९, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका,१९७८, भाग पहिला, उप विभाग- पाच, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तिका, परिच्छेद क्र.१३४ (१) अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार तसेच सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ३३/२०२२/ईमा-२/ दि. ३ मार्च, २०२२ अन्वये प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

०५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०२५०३०७१८३५५२११०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

POOJA PRASAD MANKAR

Digitally signed by POOJA PRASAD MANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FOOD CIVIL SUPPLY AND CONSUMER PROTECTION DEPARTMENT, 2.5.4.20=2587c101141ff0822d1f39f866ca3537dfc0e52728f898604a75ff77b46e7415, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=3063036B7F64E995ED6A8BC7C9FBB1A5A10E6562F73D65107AD668D006B3B164, cn=POOJA PRASAD MANKAR
Date: 2025.03.07 18:36:33 +05'30'

**(पूजा मानकर)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१.महालेखापाल-१, (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर
२.महालेखापाल-१, (लेखा व परीक्षा), मुंबई / नागपूर
३.नियंत्रक, वैध मापन शास्त्र, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४.वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई. यांना कळविण्यात येते की, सदर निधी मुक्त करण्याबाबत वित्त विभागास प्रस्ताव सादर करण्यात यावा.
५.जिल्हा कोषागार अधिकारी, लातूर
६.सह नियंत्रक,वैध मापन शास्त्र, छ.संभाजीनगर विभागीय कार्यालय, छ.संभाजीनगर
७. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग क्र.२, लातूर
८. उप नियंत्रक,वैध मापन शास्त्र, लातूर-धाराशिव जिल्हे
९.वित्त विभाग (विनियम), मंत्रालय, मुंबई.
१०.निवडनस्ती, (ग्रा.सं.-३).